नक्षलग्रस्त भागातील अतिसंवेदनाशील पोलीस ठाणी /पोलीस उप ठाणी / सशस्त्र दूरक्षेत्र घोषित करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक - एनएएक्स १११०/प्र.क्र. ४९९/ विशा- १ ब
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक १८ फेब्रुवारी, २०११

वाचा :- (१) शा.नि. , गृह विभाग, क्र. एनएएक्स ०८०९/प्र.क्र. ४९८/ विशा- १ ब, दिनांक २ सप्टेंबर २००९
(२) शा.नि. , गृह विभाग, क्र - एनएएक्स ०८०९/प्र.क्र. ५००/विशा- १ ब, दिनांक ३ नोव्हेंबर २००९
(३) शा.नि. , गृह विभाग, क्र - अेपीओ २८०९/प्र.क्र. २९०/पोल-३, दिनांक ३१ डिसेंबर २००९

**प्रस्तावना :-** नक्षलवाद्यांच्या हिसंक व अतिरेकी कारवाया विचारात घेऊन अविभाज्य गडचिरोली जिल्हयातील अतिसंवेदनशील पोलीस ठाणी/ उप पोलीस ठाणी व सशस्त्र दूरक्षेत्र तसेच इतर कार्यालये अति सयंवेदनशील म्हणून संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ३ नोव्हेंबर २००९ च्या शासन निर्णयाव्दारे निश्चित करण्यात आली होती. संदर्भाधिन क्रमांक ३ येथील दिनांक ३१ डिसेंबर २००९ च्या शासन निर्णयानुसार गडचिरोली जिल्हयाचे विभाजन करुन गडचिरोली व अहेरी असे दोन पोलीस जिल्हे त्याचप्रमाणे गडचिरोली नवीन परिक्षेत्राची निर्मिती करण्यात आली व त्यासाठी २३५५ अतिरिक्त पदे नव्याने निर्माण करण्यात आलेली आहेत. यास्तव संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयात नमूद अतिसंवेदनशील पोलीस ठाणी , पोलीस उप ठाणे व सशस्त्र दूरक्षेत्र व इतर कार्यालये नव्याने निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच गोंदिया जिल्हयातील अति संवेदनशील पोलीस ठाणी सशस्त्र दूरक्षेत्र व कार्यालये सुध्दा निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

गडचिरोली व अहेरी जिल्हयातील खालील पोलीस ठाणी,पोलीस उप ठाणी व सशस्त्र दूरक्षेत्र अति संवेदनशील म्हणून घोषित करण्यात येत आहेत :-

| पोलीस ठाणी | | पोलीस उप ठाणी | | सशस्त्र दूरक्षेत्र | |
|---|---|---|---|---|---|
| १) कुरखेडा | २) पुराडा | १) पेंढरी | २) पेरमेली | १) मालेवाडा | २) बेडगांव |
| ३) कोरची | ४) धानोरा | ३) दामरंचा | ४) रेपनपल्ली | ३) कोटगुल | ४) व्यंकटापूर |
| ५) एटापल्ली | ६) जारावंडी | ५) जीमलगट्टा | ६) वेंकटापूर | ५) पोटेगांव | ६) मुरुमगांव |
| ७) भामरागड | ८) सिरोंचा | ७) देवलमरी | ८) देचलीपेठा | ७) सावरगांव | ८) गट्टा (फू) |
| ९) मुलचेरा | १०) आसर अल्ली | ९) कसनसूर | १०) लाहेरी | ९) कारवाफा | १०) बोलेपल्ली |
| | | ११) कुवाकोडी | १२) रेगुंठा | ११) घोट | १२) मन्ने राजाराम |
| | | १३) टेकडा कॅम्प, बामणी | १४) झिंगानूर | १३) मरपल्ली | १४) गट्टा (जां) |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | --- | --- | १५) ऐमली बुरगी | १६) कोटमी |
| --- | --- | --- | --- | १७) नारगुंडा | १८) ताडगांव |
| --- | --- | --- | --- | १९) कोठी | २०) दोडराज |
| --- | --- | --- | --- | २१) गोडलवाही | २२) हलेवारा |
| | | | | २३) रेगडी | २४)हेडरी |
| | | | | २५) दोधूर | २६) मुंगनेर |
| | | | | २७) रांगी | २८) येरकड |
| | | | | २९) मसेली | |

याशिवाय गडचिरोली व अहेरी पोलीस जिल्हयातील खालील कार्यालये अति संवेदनशील म्हणून घोषित करण्यात आली आहेत :-

१) सी-६० कमांडो पथक (वाहन चालकासहित)

२) बॉम्बशोधक व नाशक पथक

३) श्वान पथक

४) नक्षल कक्ष

५) वायरलेस विभाग, [ रेडिओ मेकॅनिक, इलेक्ट्रेशियन, वायरलेस ऑपरेटर्स, वर्कशॉप हॅन्डस् ( मदतनीस ) ही पदे ]

६) उप विभागीय पोलीस अधिकारी - कुरखेडा, धानोरा, पेंढरी ,एटापल्ली, भामरागड,सिरोंचा व अहेरी.

७) सर्व अप्पर पोलीस अधिक्षक

८) सर्व पोलीस अधिक्षक

९) पोलीस उपमहानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र

२. तसेच गोंदिया जिल्हयातील खालील पोलीस ठाणी व सशस्त्र दूरक्षेत्र अतिसंवेदनाशील म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

| **पोलीस ठाणी** | **सशस्त्र दूरक्षेत्र** |
|---|---|
| (१) सालेकसा | (१) दरेकसा (२) बीजेपार (३) बोंडे (४) गणुटोला |
| (२) देवरी | (५) मगरडोह (६) भरणोली (७) गोठाणगाव |
| (३) चिचगड | (८) धाबेपवनी |
| (४) केशोरी | |
| (५) नवेगाव | |
| (६) डुग्गलीपार | |

तसेच गोंदिया जिल्हयातील खालील कार्यालये / पदे अतिसंवेदनाशील म्हणून घोषित करण्यात येत आहेत :-

(१) पोलीस उपमुख्यालय, देवरी

(२) सी-६० कमांडो पथक, गोंदिया (वाहनचालकासहित)

(३) सी-६० कमांडो पथक, उप मुख्यालय - देवरी (वाहनचालकासहित)

(४) उप विभागीय पोलीस अधिकारी, देवरी

(५) उप विभागीय पोलीस अधिकारी, आमगाव

(६) अपर पोलीस अधिक्षक, गोंदिया (देवरी)

(७) पोलीस अधिक्षक, गोंदिया

(८) नक्षल कक्ष , गोंदिया

३. वरील पोलीस ठाणी, उप ठाणी, सशस्त्र दूरक्षेत्र व इतर कार्यालये प्रथमतः दोन वर्षासाठी अति संवेदनशील म्हणून घोषित करण्यात येत असून दोन वर्षानंतर याबाबत आढाव घेऊन आवश्यकतेनुसार फेरबदल करण्यात येतील.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७/का १४१७, १९.०१.२०११ या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असुन त्याचा संगणक सांकेताक २०११०२१८१९१४०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( सु. ग. सोनवणे )

**उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग**

प्रत,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

पोलीस महासंचालक (विशेष अभियान), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.

आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई.

पोलीस उप महानिरीक्षक, नक्षलविरोधी अभियान, महाराष्ट राज्य, नागपूर.

पोलीस अधिक्षक, गडचिरोली, अहेरी, गोंदिया

मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

मा.राज्यमंत्री (गृह) मंत्रालय,मुंबई.

गृह विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग (व्यय-७),मंत्रालय, मुंबई.

निवडनस्ती, वि.शा.१ ब.